गणपतीचे ध्यान, आपल्या शरीरातील मूलाधारचक्रातच करीत असतात.

सर्वात्मक स्वरूपानंतर, त्या गणपतीचा साक्षात्कार होण्यासाठी गणेशविद्या सांगितली आहे.

गणादि म्हणजे ग्कार. वर्णादि म्हणजे अकार. प्रथम सांकेतिक रीतीने गणेशमंत्र सांगितला आहे. आणि पुढे तोच अधिक सुलभतेने सांगितला आहे. थोडक्यात 'ॐ गँ' हे मंत्रस्वरूप ठेवले. ग्कार ब्रह्मदेवाचे प्रतीक, अकार विष्णुरूपी; अनुस्वार शिवरूपी, अनुनासिक हे सूर्याचेच रूप, तर ॐकार शक्तिरूप आहे, म्हणून ॐ गँ मंत्र देवता पंचायतनच आहे असे मुद्‌गल पुराणात पाचव्या खंडात सांगितले आहे. हा मंत्र म्हणजेच गणेशविद्या. त्याचा गणक हा ऋषि आणि निचृद्‌गायत्री हा छंद आहे. गणेशविद्येनंतर गणेश गायत्री सांगितली आहे. एकदंताय विद्महे वगैरे याप्रमाणे नाममंत्रापुढे एकाक्षर मंत्र, मग गायत्रीमंत्र सांगून मग सगुण ध्यानाकरिता गणेशमूर्तीचे स्वरूप सांगितले आहे. तशी मूर्ति अथर्वशीर्षाचे आवर्तन करताना दृष्टीसमोर आणावी. त्याच्या हातातील पाश भक्तांचा मोह नष्ट करतो. अंकुश त्याचे नियमन करतो. रद धारण करणारा म्हणजे दुष्ट संहारक आणि शत्रुनाशक, तर सकाम पुरुषांची कामना पूर्ण करणारा म्हणून वरदमुद्राधारी; पण वस्तुत: सर्वभोक्ता ईश्वर चोराप्रमाणे त्याचे ठिकाणी राहून ते भोग भोगीत असतो. मानवप्रेरक गणपतीचे वाहन यामुळे मूषक असे ठरले असावे. लंबोदर, शूर्पकर्णक वगैरे विशेषणामागे रहस्य आहेत. यानंतरचा म्हणजे एतद् अथर्वशीर्ष वगैरे भाग हा फलश्रुति आहे. अथर्वशीर्षविद्येबद्दल होमहवनादि प्रत्यक्ष मार्गदर्शन पुण्याचे न्यायरत्न विनोद करीत असत. सहकार निवास, दादर, मुंबई २८ येथील श्री. बी. के. देशपांडे यांना याबद्दलचा प्रत्यक्ष अनुभव आणि उत्तम ज्ञान होते. साधकांना फायदा व्हावा म्हणून याबाबतीत ॲडव्होकेट श्री. मनोहर पटवर्धन, मुंबई, यांचाही निर्देश करून विस्तारभयास्तव हे विवेचन येथेच संपवितो.

## काही प्रसिद्ध गणेश यंत्रे व उपासना

यंत्र म्हणजे देवतेचे प्रतीक. ही यंत्रे चौकोन, त्रिकोन, वर्तुळे वगैरे भूमितीच्या आकृतीच्या साहाय्याने काढतात. यंत्राचा अर्थ ग्रह. यम धातूपासून यंत्र हा शब्द आला. त्यावरून नियंत्रणाची प्रक्रिया दृष्टिगोचर होते. एखाद्या फार मोठ्या विशाल स्वरूपाच्या वस्तूला एका विशिष्ट स्थानी मर्यादित करणे अथवा त्या

वस्तूवर नियंत्रण ठेवणे. आजकाल वैज्ञानिक क्षेत्रात तर यंत्राची उपयुक्तता पदोपदी जाणवते. उपासनामार्गात ह्या तांत्रिक यंत्रांना निर्गुण ब्रह्माच्या शक्तिविकासाची प्रतीके मानले जाते.

यंत्र म्हणजे त्या देवतेचे शरीर आणि मंत्र हा आत्मा. सर जॉन वुडरॉफने 'प्रिन्सिपल्स ऑफ तंत्र' या पुस्तकात म्हटले आहे की यंत्र हे नाव, काम क्रोध व दुसऱ्या मनोविकारांना तसेच त्यांच्या दुष्परिणामांना नियंत्रित करणारे अशा अर्थाने रूढ झाले. कुलार्णव तंत्रानुसार, **'यमभूतादि सर्वेभ्यो भयेभ्योऽपि कुलेश्वरि। त्रायते सततञ्चैव तस्माद् यंत्रमितीरितम्।'** अशी यंत्राची व्याख्या आहे. **'कामंक्रोधादिदोषोत्थं सर्वपाप: स्वनियंत्रणात्। यंत्रमित्याहुरेतस्मिन् देव: प्रीणाति पूजित:॥** या श्लोकात यंत्रपूजेचे फळ सुस्पष्ट झाले आहे.

यंत्रांत बिंदू, रेखा, त्रिकोण, वर्तुळादी भूमितीविज्ञानाचा उपयोग होतो प्रसिद्ध तत्त्वज्ञ प्लेटो याने आपल्या पाठशाळेच्या बाहेर भूमितीविषयी एक घोषणा लिहिली होती- ज्या विद्यार्थ्याला भूमिती येत नसेल त्याने ह्या पाठशाळेत प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न करू नये. तंत्रविज्ञानात चौकोनात बहुमुखतेचा भाव असतो व तो पृथ्वीचा द्योतक मानला जातो. त्रिकोणाचे टोक वरच्या बाजूला असले म्हणजे ते अग्निशिखेचे प्रतीक मानले जाते. त्रिकोणाचा शीर्षकोण खालच्या बाजूला असला तर ते जलतत्त्वाचे द्योतक मानतात. वर्तुळ वायुतत्त्वाचे द्योतक मानतात. कारण वर्तुळात चक्राकार गतीची लक्षणे असतात. यंत्रात सर्वात बाहेर जो चतुष्कोण असतो त्याला भूपूर म्हणतात. ते विश्वनगराचे प्रतीक मानतात. बिंदू यंत्राच्या मध्यभागी असतो. तो अंतिम लक्ष्य मानला जातो. त्यातच ईश्वराचे दर्शन होते.

'प्रतिमाया: अभावे अपि वक्ष्यमाणलक्षणं यंत्रं विलिख्य पूजयेत्।' असे शास्त्रवचन आहे. ज्या देवतेचे पूजन करावयाचे त्या देवतेची मूर्ती जवळ नसली तर त्या देवतेच्या यंत्राची पूजा करावी.

बीजमंत्रावर ॐ लिहिणे म्हणजे बीजमंत्राचे सम्पुटीकरण होय. बीजाक्षर लिहिल्यानंतर आवरण देवतांची स्थापना करावी लागते. ही आवरणे ९ पर्यंत असतात. यंत्राला चार दारे असतात. कापडावर यंत्र काढावयाचे असले तर रेशमी किंवा सौभाग्यवर्धक भगव्या वगैरे वस्त्रावर ते चंदन, कस्तुरी किंवा कुंकवाने काढावे.

गौरीयामल तंत्रानुसार यंत्राचे चार प्रकार असतात. १) भूपृष्ठ, २) कूर्मपृष्ठ, ३) पद्मपृष्ठ, ४) मेरूपृष्ठ. धातूवर किंवा रत्नांवर खोदलेली यंत्रे अधिक प्रभावी मानली जातात. गणेशभक्तांच्या उपयोगासाठी पुढे निवडक आठ गणेश यंत्रांच्या आकृती व पूजाविधी दिल्या आहेत.

## पहिले श्रीगणेश यंत्र

**या यंत्राचा मंत्र 'गँ गणपतये नमः। गायत्री- एकदन्ताय विदम्हे वक्रतुण्डाय धीमहि तन्नो दन्ती प्रचोदयात्।।**

**ध्यान–** एकदन्तं चतुर्हस्तं पाशमंकुशधारिणम्। रदं च बरदं हस्तैर्बिभ्राणं मूषक ध्वजम्। रक्तं लंबोदरं शूर्पकर्णकं रक्तवासमम्। रक्तगन्धानुलिप्ताङ्गं रक्तपुष्पैः सुपूजितम्। भक्तानुकम्पिनं देवं जगत्कारणमच्युतम्। आविर्भूतं च सृष्टयादौ प्रकृतेः पुरुषात्परम्। एवं ध्यायति यो नित्यं स योगी योगिनां वरः।




श्रीगणेशयंत्र

## अष्टविनायक यात्रा समाप्तीनंतरचे गीत -

पूर्ण झाली यात्रा । सुखाने प्रेमाने ।
अष्टविनायक आम्ही । आठवितो मनोमनी ॥धृ. ॥
वाटे समाधान । आनंदले चित्त ।
भक्तगणांसी । तूचि कृपावंत ।
घ्यावि अशी सेवा । देवा, तू नेमाने ॥१ ॥ अष्ट०
जपुनि हा ठेवा । राहो मनोमनी ।
स्मृतिगंध ह्याचा । यावा निशिदिनी ।
दिन उगवावा । गणेशदर्शनी ।
अष्टविनायक आम्ही । आठवतो मनोमनी ॥

(**'अष्टविनायक श्रुतिदर्शन'** या कॅसेटमध्ये ही अष्टविनायक गीते, आरत्या आणि सुप्रसिद्ध लेखक श्री. व. पु. काळे यांचे निवेदन समाविष्ट आहे.)

## प्रार्थना

**सर्वेषां स्वस्तिर्भवतु । सर्वेषां शान्तिर्भवतु ।**
**सर्वेषां पूर्णं भवतु । सर्वेषां मंगलं भवतु ॥**
**लोकाः समस्ताः सुखिनो भवन्तु ।**
**सर्वेऽत्र सुखिनः सन्तु । सर्वे सन्तु निरामयाः ।**
**सर्वे भद्राणि पश्यन्तु । मा कश्चिद् दुःखमाप्नुयात् ॥**

## श्रीगणपति - अथर्वशीर्ष - मराठी अनुवाद

सर्वसाधारणपणे आवर्तने म्हणणारे गणेशभक्त आवर्तन म्हणताना ऋग्वेदातील "भ्रद्रं कर्णेभिः" तसेच स्वस्ति न इन्द्रो, ह्या दोन ऋचा किंवा 'सहनाववतु.' ही प्रार्थना न म्हणता ॥ हरिॐ ॥ असाच प्रारंभ करून आवर्तने सुरु करतात. मोरगाव सांप्रदायानुसार "प्रथम श्रीब्रह्मणस्पतये नमः" असा प्रारंभ करून मग हरि ॐ म्हणून आवर्तने म्हणतात. (रूढार्थाने २१ आवर्तने म्हणजे एक एकादशिनी झाली असे समजतात.) ही आवर्तने ब्राह्मणाद्वारे अथवा स्वतः करतात.

## आवर्तने म्हणावयाची पद्धत

मुख्य अथर्वशीर्षात छोटे मोठे गद्य दहा विभाग आहेत. ते पहिल्यापासून शेवटपर्यंत असे एकवीस वेळा म्हणावे किंवा पुस्तकातून वाचावे आणि नंतर फलश्रुतीचे ११ ते १४ हे तीन भाग एकदाच म्हणावे. त्यांची सुरवात एतद्थर्वशीर्ष पासून होते व

शेवटी इत्युपनिषत् हे शब्द येतात. ११, २१, १०८, किंवा, १००० आवर्तने म्हणजे सहस्त्रावर्तने करतानाही फलश्रुतीचे ११ ते १४ हे तीन भाग शेवटी एकदाच म्हणतात.

परंतु काही गाणपत्य "इत्युपनिषद्" ह्या शेवटच्या शब्दानुसार हे संपूर्ण अथर्वशीर्ष एक उपनिषद् आहे म्हणून अथर्वशीर्षाची अपेक्षित आवर्तने फलश्रुतीसह संपूर्ण करतात.

स्वत:ला जमेल तो पर्याय निवडावा. परंतु स्वत:च ही आवर्तने करणे इष्ट. संस्कृत येत नसले तर हा मराठी अनुवादही **अपेक्षित वेळा वाचावा. भक्तिभावाने केलेली उपासना देवाला पोहोचते.**

## मुख्य भाग

॥ हरि: ॐ ॥

ॐ हे गणपती तुला नमस्कार असो. हे गणपते तूच प्रत्यक्ष दिसणारे परमतत्त्व आहेस. तूच एकटा सृष्टीचा निर्माणकर्ता आहेस. तूच एकटा या सर्व सृष्टीचा पालनकर्ता आहेस. तूच एकटा संहारकर्ता आहेस. "त्वं सर्वं खलु इदं ब्रह्म" म्हणजे तूच खरोखर हे ब्रह्म आहेस. ह्या श्रुतिवचनात सांगितलेले सर्वव्यापी ब्रह्मही तूच आहेस. तूच प्रत्यक्ष अविनाशी असे आत्मस्वरूप आहेस ॥१॥

मी मनापासून दैवी आणि लौकिक त्रिकाळाबाधित असे सत्य तेच बोलतो आहे ॥२॥

तू माझे रक्षण कर. (तुझ्या स्वरूपाचे वर्णन करणाऱ्या माझे म्हणजे) वक्त्याचे रक्षण कर. (तुझ्या गुणांचे) श्रवण करणाऱ्या माझे रक्षण कर. (तुझ्या उपासनेसाठी लोकांना दान करणाऱ्या माझे रक्षण कर. (तुझ्या उपासनेची) साधने उत्पन्न करणाऱ्या माझे रक्षण कर. (गुरूजवळ सांगोपांग वेदाध्यन करणाऱ्या माझे म्हणजे) अनूचानाचे रक्षण कर. शिष्यांचे रक्षण कर. (तुझ्या भक्ति-उपासनेत निर्माण होणाऱ्या नाना प्रकारच्या विघ्नांपासून) तू माझे पश्चिम दिशेपासून (किंवा पूर्व पातकापासून) रक्षण कर. तू पूर्वेकडून किंवा पुढे होणाऱ्या पापांपासून माझे रक्षण कर. उत्तरेकडून रक्षण कर. दक्षिणेकडून रक्षण कर. वरच्या आणि खालच्या दिशांकडून (माझे) रक्षण कर. सर्व अवांतर दिशांकडून व वरून, खालून आणि आसपासच्या भागांकडून तू (माझे) रक्षण कर ॥३॥

तू वाङ्मय म्हणजे वाणीस्वरूप आहेस. तू चिन्मय म्हणजे नामस्वरूपात्मक जीवनस्वरूपी आहेस. तू आनंदमय ब्रह्ममय आहेस. तू सत् म्हणजे अस्तित्व, चित् म्हणजे ज्ञान आणि आनंद याहून अभिन्न प्रत्यक्ष (हृदयनिवासी) ब्रह्मच आहेस. तू ज्ञानमय तसाच विज्ञानमयही आहेस. ॥४॥

हे सर्व जग तुझ्या पासून उत्पन्न होते. हे सर्व तुझ्यामुळे टिकून राहते आणि हे सर्व जग तुझ्या ठिकाणी लय पावते, विलीन होते. (सारांश या जगाची उत्पत्ति स्थिती लय करणारा तूच आहेस. तसेच हे सर्व जग (प्रलयकाळी तुझ्या ठिकाणीच परत येते. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश (ही पंचमहाभूते) तूच आहेस. (बेंबीत निर्माण होणारी परावाणी, ह्रदयात स्फुरणारी पश्यन्ती वाणी, गळ्यातून उमटणारी मध्यमा वाणी आणि जिभेने बोलली जाणारी वैखरी वाणी) ह्या चारही वाणींचे उगमस्थान तूच आहेस. ॥५ ॥

तू (सत्त्व, रज आणि तम या) त्रिगुणांच्या पलीकडचा आहेस. तू (स्थूल, सूक्ष्म आणि आनंददायी अशा तीन देहापलीकडील आहेस. तू (उत्पत्ति, स्थिति, लय अथवा भूतकाळ, वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ या तीन काळांच्या पलीकडचा आहेस. तू शरीरातील मूलाधार नावाच्या चक्राच्या ठिकाणी नित्य राहतोस. तू (जगाची उत्पत्ती स्थिती व लय असणाऱ्या त्रिविध शक्तीच्या स्वरूपी आहेस. (जीवनन्मुक्त) योगी निरंतर तुझे ध्यान करतात. तू (सृष्टिनिर्माता) ब्रह्मदेव आहेस. (सृष्टिपालक) विष्णू आहेस. (सृष्टीचा संहारक) रुद्र आहेस. तू (त्रिभुवन ऐश्वर्याचा उपभोग घेणारा दैदीप्यमान) इंद्र आहेस. तू (यज्ञामध्ये हविर्भाव घेणारा) अग्नी आहेस. (सर्व जीवांना प्राण देणारा) वायू आहेस. तू (सर्वांना प्रकाश देऊन कार्याची प्रेरणा देणारा सूर्य आहेस. तू (सर्व वनस्पतींना जीवन देणारा) चंद्र आहेस. तू (सर्व प्राणिमात्रातील जीवनरूपी) ब्रह्म आणि पृथ्वी, अंतरिक्ष, स्वर्ग आणि ॐकार हे सर्व तूच आहेस. ॥६ ॥

गण या शब्दाचा पहिला वर्ण ग् कार प्रथम उच्चारून, सर्व वर्णातील म्हणजे अक्षरांतील प्रथम म्हणजे अकार त्याच्यापुढे उच्चारावा. त्याच्यापुढे अनुस्वार सानुनासिक म्हणजे अर्धचंद्रांकित असा उच्चारावा. तार म्हणजे प्रणव. त्याने तो एकाक्षर मंत्र रुद्ध म्हणजे (दोन्ही बाजूनी) युक्त असावा. प्रथम प्रणव म्हणजे ॐकार उच्चारून नंतर एकाक्षर मंत्र आणि नंतर पुन: - ॐकार उच्चारावा हे तुझ्या मनूचे म्हणजे मंत्राचे स्वरूप आहे.

ग कार हे मंत्राचे पूर्वरूप पहिले अक्षर आहे. मधला वर्ण अकार असा आहे. शेवटचा वर्ण अनुस्वार आहे. अनुस्वारापुढे बिंदू अनुनासिक चिन्ह आहे. या भिन्न भिन्न वर्णांचे संधान म्हणजे एकीकरण करणाऱ्या नादासारखा स्वर असावा. या नादाने प्रेरित वर्णाचा संधि मिलन संहितारूप (एका प्रमाणात) उच्चार करणे असा असावा. अशा प्रकारे उच्चारलेला मंत्र म्हणजेच ही गणेश विद्या आहे. या मंत्राचा ऋषि गणक (नावाचा) आहे. निचृद् गायत्री हा त्याचा छंद असून गणपती ही ह्या मंत्राची देवता आहे. ॐ गँ हे ते मंत्रस्वरूप आहे. त्याचा जप झाल्यावर शेवटी गणपतये नम: । म्हणजे, गणपतीला

नमस्कार असो असे म्हणून नमस्कार करावा. या मंत्रात ग् कार ब्रह्मदेवरूपी अकार विष्णुरुपी तर अनुस्वार शिवरूपी आहे. अनुनासिक सूर्यरूपी तर ॐ कार हा शक्तिरूपी आहे. अशा रीतीने ब्रह्मा विष्णु शिव सूर्य आणि शक्ती या देवता पंचायतनाचे रूप असा हा श्रीगणेशाचा एकाक्षरी मंत्र आहे. ॥७ ॥

(आता गणपतीची गायत्री अशी आहे.) आम्ही एकदंताला तो सर्वार्थदाता आहे असे जाणतो आणि त्या वक्रतुण्डाचे ध्यान करतो, त्याला मनात साठवितो. तो (ब्रह्मात्मक) एकदंत असणारा देव आम्हाला (भक्तीची) प्रेरणा देवो. ॥८ ॥

गायत्री मंत्राच्या प्रत्येक चरणात आठ अक्षरे असतात. त्यात एक कमी असले तर ती निचृद गायत्री होते. (ॐ गँ गणपतये) ही सात अक्षरे होतात. तीच निचृद् गायत्री असावी.

(प्रथम नाममंत्रापुढे एकाक्षर मंत्रानंतर गायत्री मंत्र असे तीन प्रकारचे मंत्र वर्णन केल्यावर ध्यानासाठी गणेशाच्या सगुण मूर्तीचे स्वरूप वर्णन केले आहे -) ज्याला एकच उजवा सुळा म्हणजे दात आहे. ज्याला चार हात असून त्यामध्ये जो (उजव्या हातात) पाश, डाव्या हातात अंकुश, (खालील डाव्या हातात) मोडका सुळे, आणि खालील उजव्या हाताने वरद मुद्रा धारण करतो, उंदीर हे ज्याच्या ध्वजावरील चिन्ह आहे, वाहन आहे, जो लाल रंगाचा आहे, मोठे पोट असलेला आहे, ज्याचे कान सुपासारखे आहेत, ज्याने लालवस्त्र परिधान केले आहे. ज्याने रक्तचंदनाची उटी अंगाला लावलेली आहे, आणि तांबड्या फुलांनी ज्याची उत्तम प्रकारे पूजा केली आहे, आपल्या भक्तांवर (निरंतर कृपा करणारा, सर्व जगाच्या उत्पतीचे कारण आणि अविनाशी आहे, जो सृष्टीच्या उत्पत्ती पूर्वीच आविर्भूत म्हणजे प्रकट झालेला आहे आणि प्रकृती व पुरुष यांच्या पलीकडचा आहे, अशा प्रकारच्या गणपतीचे जो निरंतर ध्यान करतो तो सर्व योग्यांमध्ये श्रेष्ठ योगी होतो. ॥९ ॥

देवसमुदाय म्हणजे व्रात. त्यांच्या स्वामीला माझा नमस्कार असो. गणांच्या पतीला नमस्कार असो. शंकराचे सेवक जे प्रमथ नावाचे गण त्यांच्या अधिपतीला नमस्कार असो. (प्रथमपती म्हणजे जगाच्या आद्य स्वामी त्याला नमस्कार असो.) लंबोदराला एकदंताला, विघ्नविनाशकाला शिवपुत्राला आणि श्रीवरदमूर्ती गणपतीला वारंवार नमस्कार असो. ॥१० ॥

(एवढ्या भागाची अपेक्षित ११, २१, १०८ किंवा १००० वेळा आवर्तने करून नंतर पुढील फलश्रुती एकदाच म्हणतात. काही भक्त मात्र पुढील फलश्रुतीसह संपूर्ण अथर्वशीर्ष अपेक्षित वेळा म्हणतात.)

## फलश्रुती

ह्या अथर्वशीर्षाचे जो अध्ययन करतो तो ब्रह्मभूय म्हणजे ब्रह्मस्वरूप होण्याला पात्र होतो. त्याला सर्व बाजूंनी सर्वत्र सुखे प्राप्त होतात. त्याला कोणत्याही विघ्नांची बाधा होत नाही. तो पंचमहापातकांपासून (म्हणजे ब्रह्महत्या, सुरापान म्हणजे दारुपिणे, गुरुच्या स्त्रीशी संग, सोन्याची चोरी आणि ही दुष्कृत्ये करणाऱ्याशी संसर्ग ठेवणे या पाच मोठ्या पापांपासून) मुक्त होतो.

या गणपती अथर्वशीर्षाचे संध्याकाळी पठण करणारा दिवसा केलेल्या पातकांचा नाश करतो. म्हणजे त्यातून मुक्त होतो. सकाळी पठण करणारा रात्री केलेल्या पातकांचा नाश करतो. सायंकाळी आणि सकाळी दोन्ही वेळ हे पठण करणारा मनुष्य पूर्णपणे निष्पाप होतो आणि पापांची जाणीव होऊन पापे करण्यापासून परावृत्त होतो. हे अथर्वशीर्ष सर्वत्र पठण करणारा निर्विघ्न होतो आणि त्याला धर्म अर्थ काम आणि मोक्ष हे चारही पुरुषार्थ प्राप्त होतात. हे अथर्वशीर्ष श्रद्धा व आदर नसलेल्या शिष्याला शिकवू नये. जर कोणी द्रव्यलोभापायी, मोहापायी असे करील तर तो अत्यंत महापापी होईल. ह्या अथर्वशीर्षाची एक हजार आवर्तने केली असता ज्या इच्छा मनात धरल्या असतील त्या सर्व पूर्ण होतात. ॥११॥

ह्या अथर्वशीर्षाच्या पठणासह जो गणपतीवर अभिषेक करतो तो उत्तम वक्ता होतो. चतुर्थीचे दिवशी काही न खाता म्हणजे उपोषण करून जो सर्व दिवसभर या अथर्वशीर्षाचा जप करतो, तो विद्यासंपन्न होतो. असे आथर्वण ऋषीचे वचन आहे. ब्रह्मादी वरील मायेचे आवरण नीट जाणावे (ब्रह्माद्यावरणं विद्यात्) (किंवा ब्रह्मादीचे आचरण जाणावे - ब्रह्माद्याचरणं विद्यात्) म्हणजे असा मनुष्य केव्हाही कोणालाही - घाबरत नाही. निर्भय होतो. ॥१२॥

जो दूर्वांकुरानी हवन करतो, तो कुबेरासारखा म्हणजे वैश्रवणाची ज्याला उपमा देता येईल एवढा धनवान होतो. जो भाताच्या लाह्यांनी हवन करतो तो सर्वत्र यशस्वी आणि मेधावान म्हणजे बुद्धिमान होतो. जो एक हजार मोदक अथर्वशीर्ष मंत्राच्या उच्चाराने यज्ञात अर्पण करतो तो आपले इष्ट फळ प्राप्त करून घेतो. तुपात बुडविलेल्या समिधांनी जो हवन करतो त्याला सर्व काही मिळते. त्याला सर्वकाही प्राप्त होते हे निश्चित. ॥१३॥

आठ ब्राह्मणांना हे अथर्वशीर्ष उत्तम प्रकारे शिकविल्यामुळे, शिकविणारा सूर्याप्रमाणे तेजस्वी होतो. (ब्रह्म जानाति असौ ब्राह्मण:, म्हणजे ब्रह्मज्ञ)

सूर्य ग्रहणाचे वेळी, महानद्यांच्या (म्हणजे गंगा, यमुना, गोदावरी, कृष्णा वगैरे मोठ्या नद्यांच्या तीरांवर अथवा त्यांच्या जलप्रवाहात उभे राहून) अथवा महाक्षेत्रांतील गणेश मूर्तीच्या सन्निध (ह्या अथर्वशीर्षाचा) जप केल्याने अथर्वशीर्ष सिद्धमंत्र होतो.

(म्हणजे त्याची उपासना सिद्ध होते.) असा जप करणारा मोठ्या विघ्नांपासून मुक्त होतो. मोठमोठ्या दोषांतून तसेच मोठमोठ्या पातकांतून मुक्त होतो. ज्याला अशा प्रकारचे ज्ञान झाले तो सर्वविद् म्हणजे सर्वज्ञानी होतो. येथे हे आथर्वण उपनिषद् समाप्त झाले. ॥१४॥

(ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

(तिन्ही काळात, त्रैलोक्यात, काया, वाचा, मनात शान्ति नांदावी)

## मूळ संस्कृत अथर्वशीर्ष

### श्रीगणपत्यथर्वशीर्षम् ।

(आवर्तन म्हणताना 'ॐ नमस्ते गणपतये' येथपासून 'श्रीवरदमूर्तये नमः' येथपर्यंत म्हणावयाचे, म्हणजे १ आवर्तन झाले. याप्रमाणे २१, १०८, १००० किंवा इष्ट संख्येइतकी आवर्तने म्हणावी व नंतर शेवटी 'एतदथर्वशीर्षं योऽधीते' पासून 'ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः' पर्यंत १ वेळा फलश्रुती म्हणावी.) पं. वसन्त अनन्त गाडगीळ 'शारदा' पुणे २ यांनी १२१ तज्ज्ञांशी चर्चा करून निश्चित केलेला पाठ असा आहे -

॥ श्रीगणेशाय नमः ॥

(शांतिमन्त्राः)

ॐ भद्रं कर्णेभिः श्रृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः । स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥१॥ ऋ. १-२९-८

ॐ स्वस्ति न इंद्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नःपूषा विश्ववेदाः । स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पतिर्दधातु ॥२॥ ऋ. १-८९-६

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ।

### अथर्वशीर्ष

ॐ नमस्ते गणपतये । त्वमेव प्रत्यक्षं तत्त्वमसि । त्वमेव केवलं कर्तासि । त्वमेव केवलं धर्तासि । त्वमेव केवलं हर्तासि । त्वमेव सर्वं खल्विदं ब्रह्मासि । त्वं साक्षादात्मासि नित्यम् ॥१॥

ऋतं वच्मि । सत्यं वच्मि ॥२॥

अव त्वं माम् । अव वक्तारम् । अव श्रोतारम् । अव दातारम् । अव धातारम् । अवानूचानमव शिष्यम् । अव पश्चात्तात् । अव पुरस्तात् । अवोत्तरात्तात् अव दक्षिणात्तात् । अव चोर्ध्वात्तात् । अवाधरात्तात् । सर्वतो मां पाहि पाहि समन्तात् ॥३॥

त्वं वाङ्मयस्त्वं चिन्मयः । त्वमानन्दमयस्त्वं ब्रह्ममयः । त्वं सच्चिदानंदाद्वितीयोऽसि । त्वं प्रत्यक्षं ब्रह्मासि । त्वं ज्ञानमयो विज्ञानमयोऽसि ॥४॥

सर्वं जगदिदं त्वत्तो जायते । सर्वं जगदिदं त्वत्तस्तिष्ठति । सर्वं जगदिदं त्वयि लयमेष्यति । सर्वं जगदिदं त्वयि प्रत्येति । त्वं भूमिरापोऽनलोऽनिलो नभः । त्वं चत्वारि

वाक् पदानि ॥५॥ त्वं गुणत्रयातीतः । त्वं देहत्रयातीतः । त्वं कालत्रयातीतः । त्वं मूलाधारस्थितोऽसि नित्यम् । त्वं शक्तित्रयात्मकः । त्वां योगिनो ध्यायन्ति नित्यम् । त्वं ब्रह्मा त्वं विष्णुस्त्वं रुद्रस्त्वमिंद्रस्त्वग्निस्त्वं वायुस्त्वं सूर्यस्त्वं चंद्रमास्त्वं ब्रह्मभूर्भुवःस्वरोम् ॥६॥

गणादिं पूर्वमुच्चार्य वर्णादिं तदनंतरम् । अनुस्वारः परतरः । अर्धेंदुलसितम् । तारेण रुद्धम् । एतत्तव मनुस्वरूपम् । गकारः पूर्वरूपम् । अकारो मध्यमरूपम् ॥ अनुस्वारश्चान्त्यरूपम् । बिन्दुरुत्तररूपम् । नादः संधानम् । संहिता संधिः । सैषा गणेशविद्या । गणक ऋषिः । निचृद्गायत्री छंदः । गणपतिर्देवता । ॐ गँ गणपतये नमः ॥७॥

एकदंताय विद्महे वक्रतुण्डाय धीमहि । तन्नो दंती प्रचोदयात् ॥८॥

एकदन्तं चतुर्हस्तं पाशमंकुशधारिणम् । रदं च वरदं हस्तैर्बिभ्राणं मूषकध्वजम् । रक्तं लंबोदरं शूर्पकर्णकं रक्तवाससम् । रक्तगंधानुलिप्तांगं रक्तपुष्पैः सुपूजितम् । भक्तानुकंपिनं देवं जगत्कारणमच्युतम् । आविर्भूतं च सृष्ट्यादौ प्रकृतेः पुरुषात् परम् । एवं ध्यायति यो नित्यं स योगी योगिनां वरः ॥९॥

नमो व्रातपतये नमो गणपतये नमः प्रमथपतये नमस्ते अस्तु लंबोदरायैकदन्ताय विघ्ननाशिने शिवसुताय श्रीवरदमूर्तये नमः ॥१०॥

## फलश्रुति

एतदथर्वशीर्षं योऽधीते । स ब्रह्मभूयाय कल्पते । स सर्वविघ्नैर्न बाध्यते । स सर्वतः सुखमेधते । स पंचमहापापात् प्रमुच्यते । सायमधीयानो दिवसकृतं पापं नाशयति । प्रातरधीयानो रात्रिकृतं पापं नाशयति । सायं प्रातःप्रयुंजानः अपापो भवति । सर्वत्राधीयानोऽपविघ्नो भवति । धर्मार्थकाममोक्षं च विंदति । इदमथर्वशीर्षमशिष्याय न देयम् । यो यदि मोहाद्दास्यति ॥ स पापीयान् भवति । सहस्रावर्तनात् । यं यं काममधीते । तं तमनेन साधयेत् ॥११॥

अनेन गणपतिमभिषिञ्चति । स वाग्मी भवति । चतुर्थ्यामनश्नजपति स विद्यावान् भवति । इत्यथर्वणवाक्यम् । ब्रह्माद्यावरणं विद्यात् । न बिभेति कदाचनेति ॥१२॥

यो दूर्वांकुरैर्यजति । स वैश्रवणोपमो भवति । यो लाजैर्यजति ॥ स यशोवान् भवति । स मेधावान् भवति । यो मोदकसहस्रेण यजति ॥ स वांछितफलमवाप्नोति । यः साज्यसमिद्भिर्यजति स सर्वं लभते स सर्वं लभते । अष्टौ ब्राह्मणान् सम्यग् ग्राहयित्वा सूर्यवर्चस्वी भवति । सूर्यग्रहे महानद्यां प्रतिमासंनिधौ वा जप्त्वा सिद्धमंत्रो भवति । महाविघ्नात् प्रमुच्यते । महादोषात् प्रमुच्यते ॥ महापापात्प्रमुच्यते । स सर्वविद्भवति स सर्वविद्भवति । य एवं वेद । इत्युपनिषद् ॥१३॥

ॐ सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै । तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै ॥

ॐ भद्रं कर्णेभिः श्रृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः । स्थिरैरङ्गैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥१॥ ॐ स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः । स्वस्ति नस्ताक्ष्र्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पर्तिदधातु । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

*प्रमुख पाठभेद :*

१) काही भक्त पाठाचा प्रारंभ हरिः ॐ नमस्ते गणपतये । तसेच प्रारंभी ॐ ब्रह्मणस्पतये नमः । म्हणतात.

२) त्वं कालत्रयातीतः नंतर त्वं अवस्थात्रयातीतः हे पद अधिक म्हणतात.

३) तन्नो दंती प्रचोदयात् ऐवजी तन्नो दन्तिः प्रचोदयात् म्हणतात.

४) शिवसुताय श्रीवरदमूर्तये ऐवजी वरदमूर्तये म्हणतात.

५) ब्रह्मद्यावरणं ऐवजी ब्रताद्याचरणं असा पाठ म्हणतात.

६) फलश्रुतीत 'सर्वतः' ऐवजी सर्वत्र असा पाठ म्हणतात.




*मन्दार गणपतीचे चित्र*

**"वृक्षरूप शमी सेवा, मंदाराची तशीच करिता हो ।**
**गणराज तुष्ट होतो, पुरवी सर्वार्थ सिद्धि देत अहो ॥"**

* * *

# श्रीगणेश कृपा

'श्रीगणपत्यथर्वशीर्षम्' हे संस्कृतात आहे. संस्कृतात म्हणायला कठीण वाटणाऱ्यांसाठी मूळ संस्कृत श्लोकांच्याच पद्धतीने म्हणता येईल असे हे श्लोकबद्ध मराठी श्रीगणपति अथर्वशीर्ष श्रीगणेश कृपेनेच अवतीर्ण होत आहे.

आवर्तने करावयाची पद्धत

सुरुवातीला १ ते ४ श्लोक (शांतिपाठ) म्हणावेत. नंतर ५ ते २५ श्लोक (मूळस्तोत्र) जितकी आवर्तने करावयाची असतील तितक्या वेळा म्हणावेत. शेवटी २६ ते ४२ श्लोक (फलश्रुती) एकदाच म्हणावेत.

प्रत्येक आवर्तनाच्या वेळी संपूर्ण अथर्वशीर्ष म्हणण्याचीही प्रथा काही ठिकाणी आढळते.

प्रा. डॉ. सी. ग. देसाई



## शांतिपाठ

सदा भद्र तें कान ऐकोत देवा।
सदा भद्र तें चक्षु पाहोत देवा॥
असे कल्पिले आयु जे ब्रह्मयाने।
जगावे पुरे ते निरोगी तनूने॥ १ ॥

रहावी सदा शक्तीशालीच अंगे।
स्तुतिस्तोत्र देवा करू भक्तिरंगे॥
तुझ्या याजनी पूजनी जीवनाचा।
कळावा खरा अर्थ आम्हा सुखाचा॥ २ ॥

करो स्वस्ति सर्वत्र तो इंद्रदेव।
जयाच्या धनाचा नसे पूर्ण ठाव॥
जगी स्वस्ति विश्वज्ञ पूषा करू दे।
तसा संकटा पक्षिराजा हरू दे॥ ३॥

सुरांचा गुरू स्वस्ति शांतीस देवो।
त्रिकाळात तैसी त्रिधा शांति होवो॥
अशी गाउनी प्रार्थना नम्रभावे।
गणेशा तुझे स्तोत्र वाचे वदावे॥ ४॥



## मूळ स्तोत्र

गणेशा तुला मी करी वंदनास।
जगी तत्त्व प्रत्यक्ष तू निर्विशेष॥
जगा निर्मुनी पाळिसी तूच त्यास।
तसे अन्ति संहारिसी तू तयास॥ ५॥

असे सर्व जे ब्रह्म ते तूचि आहे।
मदीयांतरंगी तुझे रूप पाहे॥
सदा सर्व भूतांत आत्मस्वरूप।
ऋतोक्ती असे सत्य हे नित्यरूप॥ ६॥

करी रक्षणा माझिया रे गणेशा।
तसे रक्षि वक्त्यास श्रोत्या, परेशा॥
सदा देवकार्यी करी दानधर्म।
तया रक्षि धात्यास जो पाळि धर्म॥ ७॥

जयाने जगी वेद कंठस्थ केले।
तयाला तुवा पाहिजे तारियेले॥
जगी नित्य रक्षी मला मागुनीया।
पुढोनी तसे ह्या भवाते तराया॥ ८॥

वरून तसे खालती दक्षिणेला।
करी रक्षणा पश्चिमा उत्तरेला॥
तसे पूर्वबाजूस रक्षी दयाळा।
तुझे ध्यान चित्ती करी मी कृपाळा॥ ९॥

प्रभो वाङ्मया चिन्मया मोदयुक्ता।
सदा सच्चिदानंद तू विघ्नहर्ता॥
असे ज्ञान विज्ञान सारे तुझ्यात।
तुझे रूप ते ब्रह्म साक्षात्पुनीत॥ १०॥

दिसे सर्व जे ते तुझ्यापासुनीया।
इथे जन्मुनी धारणा लाभुनीया॥
तुझ्यामाजि ते अन्ति होई विलीन।
तुझ्या आत्मरूपात जाई विरोन॥ ११॥

तुझे रूप ते भूमि आकाश आप।
तुझे रूप ते तेज वायू अमाप॥
तशा चार वाणी परादी तुझ्यात।
म्हणोनी तुझे नाव वागीश ख्यात॥ १२॥

गुणांच्या त्रयातीत तू नित्यरूप।
तसा तीन देहांहुनी भिन्नरूप॥
असो भूत भावी तथा वर्तमान।
त्रिकाळास भेदून होसी समान॥ १३॥

तुझा मूळ- आधार चक्रात वास।
तुझ्यामाजि शक्तित्रयांचा निवास॥
तुला नित्य योगी मनामाजि ध्याती।
तयां आत्मरूपात येई प्रचीती॥ १४॥

तुझे रूप ब्रह्मा तसा विष्णु रुद्र।
तुझे रूप इन्द्राग्नि तो सूर्य चंद्र॥
तुझे रूप वायूत ब्रह्मात आहे।
तसे भूर्भुवस्व:त ते नांदताहे॥ १५॥

गणादी म्हणोनी अकारा म्हणावे।
अनुस्वार अर्धेंदुयुक्ते स्मरावे॥
म्हणावा सदा मंत्र ॐकारयुक्त।
असे हे गणेशा तुझे तंत्ररूप॥ १६॥

'गँ' मंत्ररूपास ॐकारयुक्ता।
जपावे तयाने मिळे शांति चित्ता॥
गकारा म्हणोनी अकारा स्मरावे।
अनुस्वार अर्धेंदुयुक्तास गावे॥ १७॥

असा 'गँ' पदाचा घुमावा निनाद।
तया संहिता संधिने स्पष्ट नाद॥
गणेशा तुझी हीच तंत्रोक्त विद्या।
जियेची असे देवता तूचि आद्या॥ १८॥

'ॐ गँ' नमू या गणांच्या पतीला।
तया एकदन्तस्वरूपा यतीला॥
जये खंडिली वक्र बुद्धी जगात।
तया वक्रतुंडा मनी साठवीत॥ १९॥

असा दंति तो प्रेरणा नित्य देतो।
चतुर्हस्त जो दन्त हाती धरीतो॥
असे पाश अंकूश तैसाच हाती।
सदा दाखवी स्वकृपा जो जनान्ती॥ २०॥

शरीरी तुझ्या लेप हा चंदनाचा।
तुझा डौल तो रक्तवस्त्रात साचा॥
तुझ्या पूजनी रक्तपुष्पे वहावी।
तुझी नित्यसेवा गणेशा करावी॥ २१॥

तुझ्या मूषकाच्या ध्वजाते स्मरावे।
तुझ्या शूर्पकर्णा गुणां आठवावे॥
करी जो कृपा भक्तवृंदावरी तो।
असा देव तू या जगा हेतु होतो॥ २२॥

असे देव तू सृष्टिपूर्वी अनादी।
तसा प्रकृतीचा असे तूच आदी॥
असे प्रकृतिप्रेरकाच्या अतीत।
तुझे रूप ध्याती जगी तेच मुक्त॥ २३॥

करी नित्य योगी अशी साधना जो।
तया योगिश्रेष्ठांत श्रेष्ठत्व दे जो॥
गणांच्या पतीला तया एकदन्ता।
नमू व्रातमुख्यास जो विघ्नहर्ता॥ २४॥

नमू या तया श्रीशिवाच्या सुताला।
असे मूर्ति जी सौख्यदा ह्या जगाला॥
नमू या तया त्या गणांच्या पतीला।
सदा विघ्नहर्त्यास लंबोदराला॥ २५॥



## फलश्रुती

करी पाठ जो नित्य हे स्तोत्र त्याला।
सदा ब्रह्मरूपात ठेवा मिळाला॥
तयाला मिळे सर्वदा सौख्यप्राप्ती।
नुरे अल्पही विघ्नचिंता स्वचित्ती॥ २६॥

तयाला मिळे पंच पापांतुनीया।
झणी मुक्ति स्तोत्रास ह्या वाचुनीया॥
सकाळी म्हणोनी निशापातकांना।
करी दूर सायं दिवापातकांना॥ २७॥

करी पाठ सायं तसे जो प्रभाती।
तयाला नसे अल्पही पापभीती॥
सदा सर्वदा पाठ आथर्वणाचा।
करी विघ्ननाशास भावार्थ त्याचा॥ २८॥

तयाला मिळे धर्म तैसाच अर्थ।
मिळोनी मनीचा पुरे काम स्वार्थ॥
मिळे अंति मुक्ती तया पाठकाला।
नये स्तोत्र देऊ कुमार्गी नराला॥ २९॥

जयाच्या मनी भाव श्रद्धा नसेल।
तयाला न द्यावे जगी स्तोत्र, फोल॥
जरी द्रव्यलोभे कुणाला प्रदान।
करी स्तोत्र तो पातकी हो महान॥ ३०॥

सहस्रावरी पाठ याचे करील।
तरी सत्वरी वांछिता पाविजेल॥
असे स्तोत्र गाऊन देवास स्नान।
जगी घालि तो होय वक्ता महान॥ ३१॥

चतुर्थी तिथीला निराहार राही।
तया प्राप्त विद्या जगी नित्य पाही॥
असे सत्य ही उक्ति आथर्वणाची।
जरी जाणली नष्ट चिंता भवाची॥ ३२॥

असे सत्स्वरूपावरी अभ्र आले।
स्वरूपी रमे ते तदा दूर झाले॥
कुणाची नसे भीति त्याला भवात।
सदा नित्य विघ्नेश ध्याई मनात॥ ३३॥

जरी पूजिला देव दूर्वांकुरांनी।
कुबेरापरी सौख्य त्याला मिळोनी॥
जगामाजि तैसाच स्वर्गी प्रमोद।
सदा लाजहोमे यशाचा प्रसाद॥ ३४॥

तया प्राप्त होई तदा तीक्ष्ण बुद्धी।
मनी पूजिता प्राप्त होईल ऋद्धी॥
सहस्रावरी मोदका यज्ञि दान।
तया लाभतो वांछितार्थ प्रसन्न॥ ३५॥

गणेशास होमात अर्पील भक्त।
समिद्पूर्ण स्वाहा असे जी घृताक्त॥
तरी सर्व लाभेल हे सत्य पाहे।
द्विजा आठ, स्तोत्रास जो देत आहे॥ ३६॥

जगी मंत्र हा सिद्ध व्हाया जपावे।
नरे स्तोत्र सूर्यग्रही भक्तिभावे॥
गणेशा तुझ्या मूर्तिसान्निध्ययोगे।
नद्यांच्या तटी ज्यामुळे तेज जागे॥ ३७॥

महाविघ्न आले तरी ते टळेल।
महादोषही सत्वरी भंगतील॥
महापातकांपासुनी होय मुक्ती।
तया सर्व विद्या जगी प्राप्त होती॥ ३८॥

असे जाणले सार ज्यांनी मनात।
तयां मुक्ति लाभे स्वरूपी निवांत॥
असा अर्थ हा सांगते श्रौतविद्या।
अशी ही अथर्वोक्ति ती आद्य विद्या॥ ३९॥

गुरूने तसे शिष्यवृंदे असावे।
सदा सौमनस्ये स्वकार्यी रमावे॥
नको द्वेष सर्वत्र शांति प्रभाव।
तयांचा सदा हो मनी नम्र भाव॥ ४०॥

करावे गणेशो सदा रक्षणास।
तयाच्या करी जो अशा या जपास॥
मिळावी तया सौख्यशक्ती अपार।
असे चिंतुनी अर्पिता पुण्य फार॥४१॥

असे मूळ गीर्वाण हे स्तोत्र काम्य।
तया प्राकृतामाजि वाचून पुण्य॥
गणेशात्मजाने अशी शब्दपूजा।
असे वाहिली, धन्य तो विघ्नराजा॥४२॥

॥ जय जय गणराज समर्थ॥

**प्राकृत श्लोकबद्ध श्रीगणपतिअथर्वशीर्ष**
**अनुवाद समाप्त.**



## प्रा. डॉ. सीताराम गणेश देसाई

राष्ट्रभाषा कोविद, ज्योतिष प्राज्ञ

एम्. ए. पी.एच्.डी.

जन्म दिनांक १५ मे १९२८

१९५० बी ए. संस्कृत व मराठी विषयांत प्रथम श्रेणी व १९५२ एम्. ए. परीक्षेत झाला वेदान्त पारितोषिक.

१९५२ ते १९६४ रुपारेल कॉलेज, मुंबई येथे संस्कृतचे लेक्चरर.

१९६४ पासून आजतागायत-संस्कृत विभाग प्रमुख मीठीबाई कॉलेज, विलेपार्ले (पश्चिम), मुंबई ५६.

१९६२ साली नव्या उपनिषदांचा सर्वांगीण अभ्यास या विषयावरील इंग्रजी प्रबंधाबद्दल मुंबई विद्यापीठाची पीएच् डी. पदवी–१९७९ तत्त्वज्ञान विषयांत एम्. ए. प्रथम श्रेणी.

## प्रा. डॉ. सीताराम गणेश देसाई, यांची संग्राह्य पुस्तकें

| सं. | नांव | रु. पैसे |
|---|---|---|
| १ | श्रीमुद्‌गल पुराण ओवीबद्ध अनुवाद भाग १ व २ एकूण | १२०–०० |
| २ | श्रीगजानन दर्शन | २५–०० |
| ३ | मागे परतोनी पाहे (सह संपादक) | ३०–०० |
| ४ | देवी दर्शन | १०–०० |
| ५ | तिळा उघड (युनेस्को परितोषिक १९६८) | ८–०० |
| ६ | सुबोध कथा ( ” ” १९६९) | ४–०० |
| ७ | असा आमुचा लग्न सोहळा | ५–०० |
| ८ | भावार्थ श्री गुरुचरित्र | ४–०० |
| ९ | श्रीदासबोधाची तोंडओळख | ४–०० |
| १० | आळशांचा राजा (रशियन लोककथा) | ३–०० |

| नं. | नांव | रु. पैसे |
|---|---|---|
| ११ | चल चल रे मुंजमुला | १–०० |
| १२ | सुभाषित मधुघट | २–०० |
| १३ | स्मृतिमंजूषा | २–०० |
| १४ | स्मृतिसौरभ | ४–०० |
| १५ | मोरया नामी मी रंगावें | १–०० |
| १६ | सत्यं शिवं सुंदरम् भाग २ (श्री सत्यसाई बाबांच्या चरित्राचा अनुवाद) | ५–०० |
| १७ | पुष्प सम्राट गुलाब (मराठी अनुवाद) | १–०० |
| १८ | बंधन आणि मुक्ती ( ” ) मूळ लेखक श्री. गुलशन नंदा | ०·३० |
| १९ | आकाशाने धरले मौन ( कादंबरी अनुवादित) ” ” ” | १०–०० |
| २० | पिंजरा ( ” ) ” ” ” | १०–०० |
| २१ | कलंक ( दिवाळी अंकात) ( ” ) ” ” ” | |
| २२ | श्री गणेश ज्ञान | २–२० |
| २३ | कौटुंबिक परिचय मंजरी | १–०० |
| २४ | मालविकाग्निमित्र ( मराठी अनुवाद) | |
| २५ | श्री गणेश उपनिषदे | |
| २६ | The Story of Shree Rama | १–५० |
| २७ | श्री गणपति अथर्वशीर्ष श्लोकबद्ध | ०-५० |
| २८ | आम्ही कालिदासाचे विदूषक | |
| २९ | गीतदासबोध | |
| ३० | मराठी ओवीबद्ध रुद्र | |